# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्र. पूरक-०५१९/प्र.क्र.१२६/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०५ डिसेंबर २०१९.

विषय :- चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०), गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, ०० १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५००९७), २७ लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली मंजूर पूरक अनुदान खर्च करण्याबाबत.

संदर्भ :-
1. १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९.
2. २) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०१९/ प्र.क्र.९३/ अर्थ-३, दिनांक ०९.०७.२०१९.
3. ३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. १३०/ पोआ/ कक्ष-१४/ अर्थसं-५/ पु.मा./ १९, दिनांक २४.०५.२०१९.
4. ४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. कक्ष-८(१४)/ २०६/१९, दिनांक १९.०९.२०१९.

ज्ञापन.

महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१९ *(सन २०१९ चा महा. अधि. क्र.९)* द्वारे गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, ०० १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५००९७), २७ लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०) रु.३५,००,००,०००/- इतके पूरक अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यापैकी ६० टक्के रक्कम म्हणजे रु.२१,००,००,०००/- हे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांना अथसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरण करण्यात आला आहे.

२. उक्त रु.२१,००,००,०००/- *(रुपये एकवीस कोटी फक्त)* हा निधी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील इमारतींच्या दुरुस्तीची, सक्षम प्राधिकाऱ्याने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली, कामे करण्यासाठी खर्च करण्यास, पुढील अटींवर, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे:-

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी कामांचे प्राथम्य ठरवून काम निहाय निधी वाटप करावा. अशा कामांचे प्राथम्य ठरवताना प्रथम पूर्ण कामे, मग अपूर्ण कामे व त्यानंतर नवीन कामे, हा अग्रक्रम लक्षात घ्यावा.

२) वित्तीय साधनसंपत्तीचा विरळ प्रसार *(Thin spreading of financial resources)* होणार नाही याची काळजी घ्यावी.

३) महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यांमधील नियमांचे अनुपालन करण्यात यावे.

४) उक्त निधीचे उपयोजन प्रमाणपत्र शासनास (गृह विभाग) सादर करणे बंधनकारक राहील.

३. याद्वारे असे प्रमाणित करण्यात येते की,-

१) उक्त लेखाशीर्षखाली कोणतेही संक्षिप्त देयक *(Abstract Bill)* प्रलंबित नाही.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९, यामधील परिच्छेद ७ व उक्त परिपत्राकाचे परिशिष्ट यांमधील अटींची सर्वसाधारणपणे पूर्ती झाली आहे.

४. हे शासन ज्ञापन, अनौपचारिक संदर्भ, वित्त विभाग, क्र. ३५६/ २०१९/ व्यय-७, दिनांक २५.१०.२०१९, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१२०५१७१९४१४१२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.12.05 17:22:38 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
पोलीस आयुक्त,
बृहन्मुंबई.

प्रत-

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (अर्थसं.-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).